ग्रामपंचायतीच्या सरपंचांना मानधन व ग्रामपंचायतीच्या सदस्यांना बैठक भत्ता मंजूर करण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
ग्राम विकास व जलसंधारण विभाग
शासन निर्णय क्र.व्हीपीएम २६९९/प्र.क्र.२०६(२)/२१
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२. दिनांक २१ जानेवारी, २०००

**प्रस्तावना :-** ग्राम पंचायतीच्या सरपंचाना मानधन व ग्रामपंचायत सदस्यांना बैठकभत्ता देण्यात यावा अशा प्रकारची मागणी शासनाकडे सातत्याने होत आहे. त्याचप्रमाणे ग्रामपंचायतीच्या प्रशासकीय व आर्थिक बाबीच्या संदर्भात शासनाने नेमलेल्या गगराणी समीतीने सुध्दा सरपंचाना मानधन व ग्रामपंचायत सदस्यांना बैठक भत्ता देण्यात यावा अशी शिफारस केली आहे. ७३ व्या घटना दुरुस्तीनुसार गाव पातळीवरील म्हणजे शेवटच्या स्तरावरील पंचायत राज संस्थेला घटनात्मक दर्जा प्राप्त झाला आहे. सध्या जवाहर ग्राम समृध्दी योजनेखाली ग्राम पंचायतीकडे मोठया प्रमाणावर निधी देण्यात येत असून सदर कार्यक्रमाची अंमलबजावणी त्यांच्याकडे सोपविण्यात आली आहे.अशाप्रकारे ग्रामपंचायतीच्या प्रमुखाची जबाबदारी वाढली आहे तसेच त्यांचा सामाजिक दर्जा देखील वाढलेला आहे. यास्तव सदर संस्थांच्या सरपंचाना मानधन देण्यात यावा किंवा कसे याबाबतचा प्रश्न ब-याच कालावधीपासून शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-** वर प्रस्तावात नमूद करण्यात आलेल्या सर्व बाबींचा सखोल विचार करुन ग्रामपंचायतीच्या सरपंचाना दरमहा मानधन व ग्रामपंचायत सदस्यांना बैठकभत्ता देण्याबद्दल शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे :-

१. ग्रामपंचायतीचे वार्षिक उत्पन्न विचारात घेवून ग्रामपंचायतीची वर्गवारी करुन सरपंचाना खालीलप्रमाणे मानधन देय राहील:-

| ग्रामपंचायतीचे वार्षिक उत्पन्न (रु.) | मानधनाची दरमहा रक्कम (रु.) |
|---|---|
| (अ) १०,०००/- पर्यंत | २००/- |
| (ब) १०,००१ ते ३०,०००/- | ३००/- |
| (क) ३०,०००/- पेक्षा जास्त | ४००/- |

२. रु. १०,०००/- पर्यंतच्या वार्षिक उत्पन्नाच्या गटातील सर्व ग्रामपंचायतीच्या सरपंच मानधनावरील संपूर्ण खर्च शासन करील.

GR-20020123170312000-1200

३. रु.१०,०००/- पेक्षा जास्त वार्षिक उत्पन्नाच्या गटातील सर्व ग्रामपंचायतीच्या सरपंच मानधनावरील ५० टक्के खर्च शासन करील व ५० टक्के खर्च संबंधित ग्राम पंचायत करील.

४. सरपंच मानधनासाठी लागणारी शासनाच्या हिश्याची रक्कम मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांच्या अधिनस्त ठेवण्यात येईल. ज्या ग्रामपंचायतीच्या सरपंच मानधनावर शासन संपूर्ण खर्च करणार आहे अशा ग्रामपंचायतींना मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद दरमहा नियमीतपणे मानधनाची रक्कम अदा करतील. तथापि ज्या ग्रामपंचायती सरपंच मानधनावर ५० टक्के खर्च करणार आहे अशा ग्रामपंचायती दरमहा प्रथम त्यांच्या व शासनाच्या हिश्याची रक्कम स्वत:च्या उत्पन्नातून खर्च करतील व नंतर संबंधित ग्रामपंचायत शासनाच्या हिश्याच्या खर्चाची प्रतीपूर्ती मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांच्याकडून करुन घेईल.

५. प्रत्येक ग्रामपंचायतीच्या सदस्यांना प्रति बैठक रु.१०/- एवढा बैठक भत्ता देण्यात येईल. परंतु एका महिन्यात एका बैठकीपेक्षा जास्त बैठका झाल्यास बैठक भत्ता मात्र फक्त एकाच बैठकीचा मिळेल.

६. ग्राम पंचायत सदस्यांच्या बैठक भत्यासाठी येणारा संपूर्ण खर्च शासन करील.

७. हा शासन निर्णय दि. १ जानेवारी,२००० पासून लागू करण्यांत येत आहे.

८. या प्रित्यर्थ येणारा खर्च कोणत्या लेखा शिर्षाखाली करावा याबाबत वेगळयाने आदेश काढण्यात येत आहेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

( रा. का. पवार )
शासनाचे उपसचिव

प्रत,

१) मा. राज्यपालांचे सचिव,
२) मा. मुख्यमंत्र्यांचे सचिव,
३) मा. उप मुख्यमंत्र्यांचे सचिव,

GR-200201231703120000-120

४) मा. मंत्री (सर्व) यांचे खाजगी सचिव,
५) मा. राज्यमंत्री (सर्व) यांचे खाजगी सचिव,
६) सर्व मंत्रालयीन विभाग,
७) सर्व विभागीय आयुक्त,
८) सर्व जिल्हाधिकारी,
९) सर्व जिल्हा परिषदेचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
१०) सर्व पंचायत समितीचे गट विकास अधिकारी,
(संबंधित मुख्य कार्यकारी अधिकारी,जिल्हा परिषद यांच्यामार्फत)
११) सर्व ग्राम पंचायतीचे सरपंच,
(संबंधित पंचायत समितीचे गट विकास अधिकारी यांच्यामार्फत)
१२) ग्राम विकास व जलसंधारण विभागातील सर्व कार्यासने,
१३) निवड नस्ती (कार्यासन २१).

GR-200201231703120000-1202